**अतिवृष्टीमुळे बृहन्मुंबईतील राज्य शासकीय**
**<u>कार्यालये लवकर सोडणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण- २०१७ / प्र. क्र. १४१ / १८ ( र. व का. )**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ ऑगस्ट, २०१७

**<u>परिपत्रक :</u>**

भारतीय हवामान खात्याने आज मंगळवार, दिनांक २९ ऑगस्ट, २०१७ रोजी दुपारी १.०० वाजता दिलेल्या इशाऱ्यानुसार पुढील ४ तासात मुंबई शहर, मुंबई उपनगर, अलिबाग, डहाणू व भोवतालच्या परिसरात अतिवृष्टी होणार आहे. त्याच बरोबर पुढील ४८ तासात उत्तर मध्य महाराष्ट्र व उत्तर कोकणासाठी अतिवृष्टीचा हवामान खात्याने इशारा दिलेला आहे.

२. सद्यस्थितीत सुरु असलेल्या पावसाचा प्रतिकूल परिणाम सार्वजनिक वाहतूक व्यवस्थेवर झालेला आहे. मंत्रालयातील व दक्षिण मुंबईतील शासकीय कार्यालयातील बहुतांश अधिकारी / कर्मचारी पश्चिम रेल्वे, मध्य व हार्बर रेल्वे तसेच बसद्वारे प्रवास करतात. भारतीय हवामान खात्याने दिलेला इशारा तसेच सद्यस्थितीत सुरु असलेल्या पावसामुळे उद्भवलेल्या परिस्थितीचा विचार करून मंत्रालयातील व बृहन्मुंबईतील सर्व शासकीय कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांना आज **<u>दुपारी २.३० वाजता</u>** कार्यालय सोडण्यास अनुमती देण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२९१५४३०९४२०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh B. Gaikwad

Digitally signed by Rajesh B. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5b1378a498cdff3fdd9ea5370b71fae3eca97e85924d0e443758ade5f0221f9a, cn=Rajesh B. Gaikwad
Date: 2017.08.29 15:32:28 +05'30'

**( रा. भा. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,

३. मा. राज्यपालांचे सचिव,
४. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
६. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
७. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
८. मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील बृहन्मुंबईतील सर्व विभाग / कार्यालये
९. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१०. निवड नस्ती ( कार्यासन १८ ).